**राज्य उत्पादन शुल्क विभागात अमरावती व नांदेड हे प्रादेशिक विभाग नव्याने निर्माण करण्यास व याकरीता नवीन पदनिर्मिती करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय, क्र.बीजीटी-१०२१/प्र.क्र.९६/राउशु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ५ जानेवारी, २०२२.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, वित्त विभाग,क्र. असंप-१००१/प्र. क्र.२९/२००१/ वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.इएसटी-२००२/सीआर-९६/इएक्ससी-४, दि.०१.०१.२००३.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५.
४) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.इएसटी-१६१६/प्र.क्र.२००/राउशु-१, दि.०२.०९.२०२१.

**प्रस्तावना:-**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील ३६११ पदांचा आकृतीबंध संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णय दि.०१.०१.२००३ अन्वये निश्चित करण्यात आला होता. त्यानंतर, शासन निर्णय, दि.०२.०९.२०२१ अन्वये राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या ३६११ पदांच्या आकृतीबंधामध्ये १८९ पदांची वाढ करुन ३२ संवर्गासाठी एकूण ३८०० पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. राज्य उत्पादन शुल्क विभागात सद्य:स्थितीत, कोकण, पुणे, औरंगाबाद, नागपूर, नाशिक व कोल्हापूर असे एकूण ६ प्रादेशिक विभाग आहेत. विभागीय स्तरावरील अधिकाऱ्याला विभागीय उपायुक्त असे संबोधण्यात येते. सदर पद हे उपायुक्त (वरिष्ठ श्रेणी) या संवर्गातील दर्जाचे आहे.

विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर विभाग, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रात सध्या ११ जिल्हे आहेत. त्यांचे कार्यक्षेत्र राज्याच्या एकूण क्षेत्रफळाच्या ३०.३९ % आहे. तर लोकसंख्या २०.४७ % इतकी आहे. महसूल विभागाच्या अमरावती व नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व जिल्हे राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या नागपूर कार्यक्षेत्रात येतात. विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर विभाग, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्हयांना मध्यप्रदेश, छत्तीसगड, तेलंगणा या राज्यांच्या सिमा आहेत. विभागीय उपायुक्त, नागपूर यांचे कार्यक्षेत्र मोठे असल्यामुळे तसेच, मद्य विक्रीच्या अनुज्ञप्त्यांमध्ये मोठी वाढ झालेली असल्यामुळे, कामकाजात वाढ झालेली आहे. प्रभावी नियंत्रणाच्या दृष्टीने राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या नागपूर विभागाचे नागपूर व अमरावती या महसूल विभागाप्रमाणे २ नविन प्रादेशिक विभाग निर्माण करणे आवश्यक आहे.

तसेच, विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांच्या कार्यक्षेत्रात एकूण ८ जिल्हे आहेत. औरंगाबाद विभागातून राज्य शुल्क विभागामार्फत राज्याला मिळणाऱ्या महसूलाच्या अंदाजे एकूण २९ % वाटा प्राप्त होतो त्यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्हयांना तेलंगणा व कर्नाटक या राज्यांच्या सिमा आहेत. त्यामुळे, मद्य तस्करीची शक्यता जास्त आहे. औरंगाबाद विभागाची लोकसंख्या, क्षेत्रफळ, गुन्हा अन्वेषण, अनुज्ञप्तींची संख्या, महसूल इ. चे

अवलोकन केले असता औरंगाबाद विभागाचे औरंगाबाद व नांदेड या दोन प्रादेशिक विभागात विभागणी करणे आवश्यक आहे.

याअनुषंगाने, राज्य उत्पादन शुल्क विभागातील नागपूर व औरंगाबाद या प्रादेशिक विभागांचे विभाजन करुन अनुक्रमे अमरावती व नांदेड असे दोन नवीन प्रादेशिक विभाग निर्माण करण्याची व त्यासाठी विविध संवर्गातील ४२ पदे नव्याने निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१. राज्य उत्पादन शुल्क विभागातील नागपूर व औरंगाबाद या प्रादेशिक विभागाचे विभाजन करुन अनुक्रमे अमरावती व नांदेड असे दोन नवीन प्रादेशिक विभाग निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर दोन नवीन प्रादेशिक विभाग निर्माण झाल्यानंतर राज्य उत्पादन शुल्क विभागाचे एकूण ८ प्रादेशिक विभाग व त्यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्हे खालीलप्रमाणे राहतील.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | मुख्यालय | कार्यक्षेत्रातील जिल्हे |
|---|---|---|---|
| १ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, कोकण विभाग, ठाणे | ठाणे | मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, पालघर. |
| २ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, पुणे विभाग, पुणे | पुणे | पुणे, सोलापूर, अहमदनगर. |
| ३ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद | औरंगाबाद | औरंगाबाद, जालना, उस्मानाबाद, बीड, |
| ४ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर विभाग, नागपूर | नागपूर | नागपूर, गोंदिया, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर, वर्धा. |
| ५ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नाशिक विभाग, नाशिक | नाशिक | नाशिक, जळगाव, धुळे, नंदुरबार. |
| ६ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क,कोल्हापूर विभाग, कोल्हापूर | कोल्हापूर | सातारा, सांगली, कोल्हापूर, रत्नागिरी, सिंधुदुर्ग. |
| ७ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, अमरावती विभाग, अमरावती | अमरावती | अमरावती, यवतमाळ, अकोला,वाशिम, बुलढाणा. |
| ८ | विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नांदेड विभाग, नांदेड | नांदेड | नांदेड, लातूर, परभणी, हिंगोली |

३. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व सचिव (व्यय), वित्त विभाग यांच्या उप समितीने दि.२४.११.२०२१ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत उच्चस्तरीय सचिव समितीने चक्रीय पद्धतीने दि.२०.११.२०२१ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार, अमरावती व नांदेड या दोन प्रादेशिक विभागासाठी खालीलप्रमाणे प्रत्येकी १९ प्रमाणे ३८ नियमित पदे व बाह्ययंत्रणेद्वारे प्रत्येकी २ प्रमाणे ४ पदे अशी एकूण ४२ नवीन पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(अ) नियमित पदे**

| अ. क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | कार्यालयनिहाय पदांची संख्या | | एकूण पदे |
|---|---|---|---|---|---|
| | | | अमरावती | नांदेड | |
| १ | विभागीय उपायुक्त | S-२३ (६७,७००-२,०८,७००) | १ | १ | २ |
| २ | लेखाधिकारी | S-१६ (४४,९००-१,४२,४००) | १ | १ | २ |
| ३ | सहाय्यक आयुक्त | S-१५ (४१,८००-१,३२,३००) | १ | १ | २ |
| ४ | प्रमुख लेखापाल (सहाय्यक लेखाधिकारी) | S-१५ (४१,८००-१,३२,३००) | १ | १ | २ |
| ५ | निरीक्षक | S-१४ (३८,६००-१,२२,८००) | १ | १ | २ |
| ६ | कार्यालय अधीक्षक | S-१४ (३८,६००-१,२२,८००) | १ | १ | २ |
| ७ | उप लेखापाल | S-१३ (३५,४००-१,१२,४००) | १ | १ | २ |
| ८ | दुय्यम निरीक्षक | S-१२ (३२,०००-१,०१,६००) | २ | २ | ४ |
| ९ | लघुटंकलेखक | S-८ (२५,५००-८१,१००) | १ | १ | २ |
| १० | वरिष्ठ लिपिक | S-८ (२५,५००-८१,१००) | १ | १ | २ |
| ११ | जवान | S-६ (१९,९००-६३,२००) | ३ | ३ | ६ |
| १२ | लिपिक-टंकलेखक | S-६ (१९,९००-६३,२००) | ३ | ३ | ६ |
| १३ | जवान-नि-वाहनचालक | S-६ (१९,९००-६३,२००) | २ | २ | ४ |
| | एकूण नियमित पदे | | १९ | १९ | ३८ |

**(ब) बाह्ययंत्रणेचे मनुष्यबळ**

| अ. क्र. | बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा | कार्यालयनिहाय मनुष्यबळ संख्या | | एकूण मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|---|---|
| | | अमरावती | नांदेड | |
| १ | चपराशी/ शिपाई | २ | २ | ४ |

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग एक मधील अ.क्र.२, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागास असणाऱ्या अधिकारान्वये विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, अमरावती विभाग, अमरावती व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नांदेड विभाग, नांदेड यांना “प्रादेशिक कार्यालय प्रमुख” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर अधिकार वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

५. सदर अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतनावर येणारा खर्च, मागणी क्र.बी-२, मुख्य लेखाशिर्ष २०३९- राज्य उत्पादन शुल्क, (००) ००१ संचालन व प्रशासन, (०२) (०१) आस्थापना निरीक्षण व प्रतिबंध ( २०३९००३२) (दत्तमत) (अनिवार्य), (०१) वेतन या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर प्रादेशिक विभाग निर्मिती व अनुषंगिक पदनिर्मितीच्या अनुषंगाने, कार्यभार व अभिलेख हस्तांतरणाच्या संदर्भात आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी आवश्यकतेनुसार आदेश निर्गमित करावेत.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभाग अनौ.सं.क्र. ३०९/व्यय-८, दि.०९.०७.२०२१ व अनौ. सं.क्र.२६५/आ.पु.क.,दि.२४.१२.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने दि.२०.१२.२०२१ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२२०१०५१६४५२१३७२९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandeep Gorakhnath Dhakane

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, cn=Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2022.01.05 17:12:54 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.राज्यमंत्री (राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) प्रधान सचिव (राउशु) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
८) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) सह सचिव (व्यय/ अर्थ/आपुक/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) उप सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
१३) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
१४) अवर सचिव/ कक्ष अधिकारी (राउशु-२/राउशु-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवडनस्ती (राउशु-१).